आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शीर्षांतर्गत निधी वितरण (लेखाशीर्ष २२०२ एच ९७३-वेतन)

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.०४/का-६.**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक: ०७ ऑक्टोबर,२०२१.**

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.
२) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग, समक्रमांक, दि.८.०४.२०२१,दि.१२.०५.२०२१, दि.२.०६.२०२१. दि.१६.०७.२०२१ व दि.१७.०९.२०२१.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची नस्ती क्र.अनुवि-४९२१/ प्र.क्र.३५/ अर्थसंकल्प.

**प्रस्तावना:-**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक,२०२१" यास विधानमंडळाने मंजुरी दिलेली असुन महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे. त्यानुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन परिपत्रकास अनुसरून वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण (BEAMS) वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिल्यानुसार आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत शालेय शिक्षण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या योजनांतर्गत ३६- सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांकरीता ५० % मर्यादेतील निधी शालेय शिक्षण विभागास संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे.

माहे सप्टेंबर अखेर वित्त विभागाने अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) ०१-वेतन, ३६-सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांकरीता अर्थसंकल्पित तरतूदींच्या १० % इतका वाढीव निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेला आहे. या अनुषंगाने सैनिकी शाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य (२२०२ एच ९७३) या योजनेकरीता सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०२१-२२ अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२०२-सर्वसाधारण शिक्षण या मुख्य लेखाशिर्षांतर्गत वित्त विभागाने वितरणाकरीता उपलब्ध करून दिल्याप्रमाणे सैनिकी शाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य (२२०२ एच ९७३), ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) करीता वार्षिक अर्थसंकल्पीत तरतूदींच्या १० टक्के मर्यादेतील **एकूण रू.१५०.०० लाख (अक्षरी रूपये एक कोटी पन्नास लाख फक्त)** इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रमाणे निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला असून प्रकरणी विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२८१५२४११६४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2021.10.07 17:50:19 +05'30'

**(रविंद्र दि.औटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग ( अर्थोपाय / अर्थ-१९ / व्यय-१४ ), मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.